**ॲड. उमेशचंद्र यादव, विशेष सरकारी अभियोक्ता यांना व्यावसायिक फी मंजूर करण्याबाबत...**
**पंतनगर पो. स्टे. गु. र. क्र. ५७१/२०१८ अन्वये दाखल गुन्हयातून उद्भवलेल्या न्याय प्रकरणी मा. सत्र न्यायालय, मुंबई व मा. उच्च न्यायालय, मुंबई या न्यायालयातील कामकाजासाठी.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एसपीपी ०२१९/प्र.क्र. ६४/पोल-१०**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
२ रा मजला, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक: २६ ऑक्टोबर, २०२१.

**संदर्भ**:- (१) शासन अधिसूचना, विधि व न्याय विभाग क्र.एसपीपी.१०१९/यू.ओ.आर.१८/कार्या-१४, दि.२३/४/ २०१९.
(२) शासन निर्णय, वित्त विभाग क्र. विअप्र-२०१५/प्र.क्र.२१/२०१५/विनियम, दि. २९/०७/२०१५.
(३) शासन निर्णय, वित्त विभाग क्र. विअप्र-२०१५/प्र.क्र.२१/२०१५/विनियम, दि.१६/०६/२०१७.

**शासन निर्णय:**

पंतनगर पो. स्टे. गु.र.क्र. ५७१/२०१८ अन्वये दाखल गुन्हयातून उद्भवलेल्या न्याय प्रकरणी मा. सत्र न्यायालय, मुंबई व मा. उच्च न्यायालय, मुंबई या न्यायालयात शासनाची बाजू प्रभावीपणे मांडण्याकरीता संदर्भ क्र.१ अन्वये विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्त ॲड. उमेशचंद्र यादव यांना खालीलप्रमाणे व्यावसायिक फी प्रदान करण्यास मान्यता देत आहे.

**मा. सत्र न्यायालय, मुंबई व मा. उच्च न्यायालय, मुंबई.**
अ) प्रतिदिन परिणामकारक सुनावणी फी - रुपये १०,०००/- (रुपये दहा हजार फक्त)
ब) प्रवास खर्च - न्यायालयात जाण्या येण्यासाठी

सदर फी व्यतिरिक्त अन्य कोणतेही लाभ ॲड. उमेशचंद्र यादव यांना अनुज्ञेय होणार नाहीत. तसेच त्यांना कोणत्याही अपरिणामकारक सुनावणीकरीता फीचे प्रदान करण्यात येणार नाही.

२. परिणामकारक सुनावणीचे दिवस संबंधित प्रकरणाच्या पर्यवेक्षीय पोलीस उपायुक्त दर्जाहून कमी नाही, अशा अधिकाऱ्याकडून तसेच संबंधित मा. न्यायालयाच्या प्रबंधकांकडून तपासून, प्रमाणित करुन घेण्यात यावेत व कोणत्याही प्रकारचे अतिरिक्त प्रदान होणार नाही, याची दक्षता संबंधित पोलीस उपायुक्त/ पोलीस अधिक्षक यांनी घ्यावी.

३. यासाठी येणारा खर्च या विभागाच्या मागणी क्र. बी-१, २०५५ पोलीस - (००) (१०८), राज्य मुख्यालय पोलीस (०२) (०१) शहर पोलीस आस्थापना - (२०५५ ००९७) -२८-व्यावसायिक व विशेष सेवा या लेखाशीर्षाखालील त्या-त्या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पीय तरतुदीच्या उपलब्धतेच्या अधीन आणि मंजूर अनुदानातून मासिक निधी विवरणपत्रानुसार भागविण्यात यावा.

४. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ. सं. क्र.४६९/२०२१/व्यय-७, दि.०७/०७/२०२१ अन्वये मिळालेल्या शासन मान्यतेनुसार तसेच संदर्भ क्र.२ व ३ वरील वित्त विभाग, शासन निर्णयानुसार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११०२७१४४९४०५०२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Tushar Dilip Rathod

Digitally signed by Tushar Dilip Rathod
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e7e9706be693397ead11bd0e0b8fbaec45488529c8b57466dbf3e7c095089c08, pseudonym=E5959DAF1A16023D678D1801FC611F35E4BD65FF, serialNumber=B88BABB31CB2C1163B5A1E41E86D809272FEA914814734600D0B42642848C06F, cn=Tushar Dilip Rathod
Date: 2021.10.27 14:52:22 +05'30'

**(तुषार दि. राठोड)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
३. पोलीस उपायुक्त, पंतनगर पोलीस स्टेशन, मुंबई.
४. वरिष्ठ पोलीस निरीक्षक, पंतनगर पोलीस स्टेशन, मुंबई.
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा) महाराष्ट्र-१ , मुंबई.
६. अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
८. ॲड. श्री. उमेशचंद्र यादव-पाटील, ३१९, ऑफीस नं. ७, पहिला मजला,मिथा मेंशन, नॅशनल रेस्टॉरंटच्यावर, शहिद भगत सिंग मार्ग, फोर्ट, मुंबई ४०० ००१.
९. कार्यासन अधिकारी (कार्या-१४) विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.कार्यासन अधिकारी (अ शाखा),विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
११.कार्यासन अधिकारी (व्यय-७), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२.निवड नस्ती (पोल-१०).